**वनाचे सर्व्हेक्षण, जमाबंदी व सिमांकन योजनेचा सन २०१४-१५ करिता चालू बाब प्रस्ताव. (४४०६-००५३).**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक :- एस-१०/२०१४/प्र.क्र.२०६/फ-३**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,

दिनांक :- ३१ जानेवारी, २०१५

**वाचा :-**

१) अपर प्रधान मुख्य वनंसरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) यांचे पत्र क्र.- कक्ष-१/पी/यो/ चाबाप्र/प्र.क्र.४०/(१४-१५)/३९९. दिनांक ९ जून, २०१४.

२) शासन निर्णय समक्रमांक दिनांक २०.०९.२०१४.

३) वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अंदाज-२०१४/प्र.क्र.११०/अर्थ-३, दि. १ जुलै,२०१४.

४) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.पुरक-२०१४/प्र.क्र.५८९/अर्थसंकल्प-३, दि.१.१.२०१५.

५) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.अंदाज-२०१४/प्र.क्र.८५/अर्थ-३, दि. २.१.२०१५.

**प्रस्तावना :**

वनहद्दीचे सर्व्हेक्षण व सिमांकन करुन कायमस्वरुपी हद्दीची निशाणे रोवून घेणे आवश्यक आहे. संरक्षित वने, अवर्गीकृत वनांचे सर्व्हेक्षण व सिमांकन पूर्णपणे झालेले नाही. काही ठिकाणी राखीव वनांची सीमा व्यवस्थित नाही. त्यामुळे वनजमीनीवर अतिक्रमण होण्याची शक्यता नाकारता येत नाही. कायमस्वरुपी हद्दीचे निशाणे रोवून घेतल्यानंतर वनजमीनीचे व्यवस्थापन, परिरक्षण करणे सुलभ होईल व पुढे अतिक्रमण होणार नाही.

सन २०१४-१५ करीता वनांचे सर्व्हेक्षण, जमाबंदी व सिमांकन यासंदर्भात उपशिर्ष (४४०६-००५३) योजनांतर्गत रु. २५.०० लक्ष रकमेचा प्रस्ताव प्रधान मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचेकडून संदर्भांकित क्र.१ च्या पत्रान्वये प्राप्त झाला आहे.

**शासन निर्णय :**

राज्ययोजना -" वनाचे सर्व्हेक्षण, जमाबंदी व सिमांकन " (४४०६ ००५३) यायोजनेचा रु.२५.०० लक्ष एवढया रकमेचा सन २०१४-१५चा प्रस्ताव प्रधान मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सादर केला होता. याकरीता सन २०१४-२०१५ या आर्थिक वर्षासाठी रु.२५.०० लक्ष नियतव्यय निश्चित करण्यात आला होता. त्यापैकी रु.१७.५० लक्षची तरतुद अर्थसंकल्पित करण्यात आली होती.

वित्त विभागाच्या संदर्भ क्र. ३ येथील दिनांक १.७.२०१४ च्या परिपत्रकानुसार अर्थसंकल्पीत रक्कम रु.१७.५० लक्ष रकमेच्या ६०% च्या मर्यादेत रु. १०.५० लक्ष इतका निधी वितरित व खर्च करण्यास उपरोक्त संदर्भ क्र. २ अनुसार मान्यता देण्यात आली आहे. आता वित्त विभागाचे संदर्भ क्रमांक ४ च्या परिपत्रकानुसार प्रस्तुत योजनेच्या उर्वरीत नियतव्यय अर्थसंकल्पीत करण्यात आला आलेला असल्याने संदर्भ क्र.३ येथील वित्त विभागाच्या परिपत्रकानुसार एकूण रु.२५.०० लक्षच्या ६०% प्रमाणे रु.१५.०० लक्ष इतकी रक्कम वितरीत करता येऊ शकते. त्यापैकी संदर्भ क्र.२ नुसार यापूर्वी रु.१०.५० लक्ष वितरीत करण्यात आलेले आहे. त्यामुळे उर्वरीत रक्कम **रु.४.५० लक्ष** इतका निधी वितरित व खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

सदर खर्च हा मागणी क्रमांक- सी-१०, ४४०६ वनीकरण व वन्यजीवन यावरील भांडवली खर्च राज्य योजनांतर्गत योजना वनाचे सर्वेक्षण, जमाबंदी व सिमांकन (४४०६-००५३) या शीर्षाखाली दर्शविण्यात यावा व सन २०१४-१५ मध्ये मंजूर अर्थसंकल्पिय अनुदानातून भागविण्यात यावा. यामध्ये कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या परिपत्रक क्र.अंदाज-२०१४/प्र.क्र.११०/अर्थ-३, दिनांक १.७.२०१४ च्या परिपत्रकान्वये विभागास प्रदान करण्यातआलेल्या अधिकारास तसेच वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.५०/२०१५/व्यय-१०, दिनांक २९.१.२०१५ अन्वये मिळालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०२०२१२२१५२७९१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

TIWARI VIRENDRA RAMBAHAL

Digitally signed by TIWARI VIRENDRA RAMBAHAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST,CID - 917243, postalCode=400032, st=Maharashtra, cn=TIWARI VIRENDRA RAMBAHAL
Date: 2015.02.02 12:31:00 +05'30'

(वीरेंद्र तिवारी)
मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)
महसूल व वन विभाग

**प्रत :-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर.

३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संधारण) महाराष्ट्र राज्य, नागपूर

४) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), नाशिक.

५) मुख्य वनसंरक्षक (भूमी अभिलेख कक्ष), नागपूर.

६) मुख्य वनसंरक्षक (भूमी अभिलेख), पनवेल.

७) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.

८) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

९) वित्त विभाग, व्यय १०/ अर्थसं-४ मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

१०) कार्यासन अधिकारी (फ-२) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

११) कार्यासन अधिकारी, ब-१, जागतीक व्यापार केंद्र, कफ परेड, मुंबई.

१२) निवडनस्ती, कार्यासन (फ-३), म.व.व.वि., मंत्रालय, मुंबई-३२.

*******